उप जिल्हाधिकारी संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. टिआरएफ-०६२३/प्र.क्र.१५२/ई-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० जून, २०२३

**संदर्भ**:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
३) शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र.पदोन्न-०३२२/प्र.क्र.२६/ई-२, दि.०५.०६.२०२३

**शासन आदेश:-**

संदर्भाधीन क्र.३ येथील आदेशान्वये श्रीमती कविता जाधव यांची जिल्हा पुनर्वसन अधिकारी, परभणी या पदावर पदस्थापना करण्यात आली होती. मात्र, प्रशासकीय कारणास्तव महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) मधील तरतूदींनुसार श्रीमती कविता जाधव यांना संदर्भ क्र.३ अन्वये देण्यात आलेल्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने खालीलप्रमाणे सुधारित पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | कार्यरत पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १) | श्रीमती कविता जाधव | जिल्हा पुनर्वसन अधिकारी, परभणी | **विशेष भूसंपादन अधिकारी (लपा), बीड** या रिक्त पदावर |

२. उपरोक्त अधिका-यांच्या बदलीमुळे रिक्त झालेल्या पदांवर अन्य अधिका-यांच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिका-यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरून या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. त्यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या पदावर दि.०३ जुलै, २०२३ (म.पू.) रुजू होणे अनिवार्य आहे.

४. संबधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e२.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलव्दारे / टपालाव्दारे शासनास त्वरीत कळवावे.

५. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय, क्र.संकीर्ण २०१६/ प्र.क्र.१८६/ १६/ कार्यासन १४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी दि.०३.०७.२०२३ (म. पू.) रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"** *(dies non)* **म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

८. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०६३०१८२१३१०९१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAV VITTHAL VEER

Digitally signed by MADHAV VITTHAL VEER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b8bcafe4a890e79ceaf1ea38b990e1e22edaeda6d9d0b7d64088adc780cd25e6, pseudonym=4E57EDEAE5DAA20669F89F9C4044778534189610, serialNumber=3C0E93AB894790967228875F0B4FD8C2FDA8590B77AE2EA700BF19E91A673AFC, cn=MADHAV VITTHAL VEER
Date: 2023.06.30 22:19:33 +05'30'

**(डॉ. माधव वीर)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

सर्व विभागीय आयुक्त.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.

- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित उप जिल्हाधिकारी (विभागीय आयुक्त, पुणे यांचेमार्फत).
- सह सचिव (ई-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-२).